**सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील मंत्रालय आहार/उपाहारगृहातील खाद्यपदार्थ, भोजनथाळी व पेयांच्या दरांचे पुनर्विलोकन करुन नव्याने दर निश्चित करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे)**
**शासन निर्णय क्रमांक: आस्था-२०१६/प्र.क्र.३२०/१६/मंउका,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २३ डिसेंबर, २०१६

**शासन निर्णय**

महाराष्ट्र शासनामार्फत सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखाली राज्य शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांकरीता कल्याणकारी योजना म्हणून मंत्रालय उपाहारगृह, चौरस आहारगृह, विधान भवन उपाहारगृह, मुंबई येथे व कोकण भवन उपाहारगृह, कोकण भवन, नवी मुंबई येथे चालविण्यात येतात. सदर सर्व आहार/उपाहारगृहातील खाद्यपदार्थ, पेये, भोजनथाळी इत्यादींच्या विक्रीच्या दरामध्ये मार्च-२०११ मध्ये सुधारणा करण्यात आली होती. तद्नंतर आजतागायत विक्रीच्या दरामध्ये सुधारणा करण्यात आलेली नाही.

२. मंत्रालय आहार/उपाहारगृहामार्फत पुरविण्यात येणारे खाद्यपदार्थ, पेये, भोजनथाळी इत्यादीसाठी लागणाऱ्या कच्च्यामालाच्या किंमतीमध्ये वाढ झाल्यामुळे शासनास या योजनांवर विक्रीच्या योजनेपेक्षा बराच अधिक खर्च करावा लगत आहे. याचा विचार करुन शासनाने मंत्रालय आहार/उपाहारगृहातील खाद्यपदार्थ, पेये, भोजनथाळी इत्यादीच्या विक्रीच्या दराचे पुनर्विलोकन करुन सुधारित दर निश्चित करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्याचा निर्णय घेतला आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | सह सचिव, सा.प्र.वि. (उपाहारगृहे) | अध्यक्ष |
| २) | उप सचिव/अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-४) | उपाध्यक्ष |
| ३) | मंत्रालय अधिकारी संघटनेचे एक प्रतिनिधी | सदस्य |
| ४) | मंत्रालय कर्मचारी संघटनेचे एक प्रतिनिधी | सदस्य |
| ५) | मंत्रालय चतुर्थश्रेणी कर्मचारी संघटनेचे एक प्रतिनिधी | सदस्य |
| ६) | महाव्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृहे | सदस्य सचिव |

३. या समितीने मंत्रालय आहार/उपाहारगृहातील खाद्यपदार्थ, भोजनथाळी, पेये इत्यादींच्या विक्रीदरांचे पुनर्विलोकन करावे व तसे करताना कच्चामालाच्या दरामधील भाववाढ व इतर सुविधांमध्ये झालेली भाववाढ विचारात घेऊन आपल्या शिफारशी शासनास लवकरात लवकर सादर कराव्या, असे अपेक्षित आहे.

४. वरील अनुक्रमांक ३ ते ५ येथील संघटनांनी आपल्या प्रतिनिधीचे नाव आठ दिवसात मंत्रालय उपाहारगृहे कार्यालयाला कळवावे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकतेस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा संकेतांक २०१६१२२३१७२४२५१६०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2016.12.23 17:31:10 +05'30'

**(इ.मु. काझी)**
**सह सचिव (उपाहारगृहे)**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३) उप सचिव/अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई
४) अध्यक्ष, मंत्रालय अधिकारी संघटना, मुंबई
५) अध्यक्ष, मंत्रालय कर्मचारी संघटना, मुंबई
६) अध्यक्ष, मंत्रालय चतुर्थश्रेणी कर्मचारी संघटना, मुंबई
७) निवड नस्ती.